**अकृषिक परवानगीची सर्व प्रकरणे अशी परवानगी दिल्यानंतर अकृषिक आकारणी संदर्भात त्वरित तहसिलदार यांचेकडे पाठविण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन परिपत्रक क्र.एनएपी-०७११/ प्र.क्र.८३ /ल-५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०४.०१.२०१२.

संदर्भ:-शासन पत्र क्र.संकीर्ण-२०११/प्र.क्र.९४/म-८, दि.१६.७.२०११.

**शासन परिपत्रक:-**

मा.मंत्री (महसूल) यांचे अध्यक्षतेखाली दिनांक ११.७.२०११ रोजी सर्व विभागीय आयुक्त यांचे समवेत बैठक घेण्यात आली. बैठकीमध्ये महसूल वाढविण्याच्या अनुषंगाने मा.प्रधान सचिव (महसूल) यांनी असे निदर्शनास आणले की, क्षेत्रीयस्तरावरील पाहणीमध्ये असे दिसून आले की, महाराष्ट्र जमिन महसूल अधिनियम १९६६ मधील कलम ४२ मधील तरतुदीनुसार जिल्हाधिकारी वा त्यांनी प्राधिकृत केलेल्या महसूल अधिकाऱ्यांकडून अकृषिक परवानगी देण्याबाबतची कार्यवाही केली जाते. अशी कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर संबंधित अकृषिक परवानगीचे आदेशाची प्रकरणे विलंबाने संबंधित तहसिलदारांकडे महाराष्ट्र जमिन महसूल अधिनियम १९६६ मधील कलम ११० व १११ मधील तरतुदीनुसार अकृषिक आकारणी निर्धारित करण्यासंदर्भात पाठविली जातात. त्यामुळे योग्यवेळी अकृषिक आकारणीची वसूली होऊ शकत नसल्यामुळे त्याचा विपरीत परिणाम महसूलावर होतो. यास्तव अकृषिक परवानगी देण्याची कार्यवाही पूर्ण झालेली सर्व प्रकरणे त्वरित तहसिलदारांकडे पाठविण्याबाबत आणि सदर प्रकरणांबाबत संबंधित तहसिलदारांमार्फत अकृषिक आकारणी वेळीच केली जाईल याची दक्षता जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.

(कृ.मा.प.)

D:\Godase-2011-\G.RC.R.83.2011.

२. वरील आदेशाचे जिल्हाधिकारी यांनी काटेकोरपणे पालन करुन त्याबाबतच्या सुचना सर्व संबंधितांना आपल्या स्तरावर देण्यात याव्यात व जिल्हाधिकारी/वरिष्ठ अधिकारी यांनी त्यांच्या भेटीच्या व निरीक्षणाच्यावेळी सदर सुचनांचे काटेकोरपणे पालन होत आहे किंवा कसे? याबाबत शहानिशा करावी.

३. उपरोक्त नमूद केलेल्या सुचना या शासन परिपत्रकान्वये आवश्यक त्या कार्यावाहीसाठी निदर्शनास आणण्यात येत आहेत.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक: **२०१२०१०४११५५५५१५५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( एस. बी. पाटणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**
१) सर्व विभागीय आयुक्त.
२) सर्व जिल्हाधिकारी.
३) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
५) प्रधान सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी , महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) कक्ष अधिकारी (म-८) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
७) निवडनस्ती, कार्यासन- ल/५, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.